**मा.श्री.किशोर तिवारी, अध्यक्ष, कै.वसंतराव नाईक शेती स्वावलंबन मिशन यांचे मासिक मानधन तसेच मुंबई दौऱ्यामध्ये वास्तव्यासाठी मंजूर केलेला दैनिक भता व इतर भत्ते यामध्ये वाढ करणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एससीवाय-२०२१/प्र.क्र.१०१/म-७**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २२ ऑक्टोबर, २०२१

वाचा : १) शासन निर्णय क्रमांक : एससीवाय-२०१५/प्र.क्र.२४४/म-७, दि.२४ ऑगस्ट, २०१५
२) शासन निर्णय क्र.एससीवाय/२०१६/प्र.क्र.७२/म-७, दि.३०.०३.२०१६
३) शासन निर्णय क्रमांक : एससीवाय-२०१५/प्र.क्र.२४४/म-७, दि.२९ डिसेंबर, २०१७
४) शासन निर्णय क्रमांक : एससीवाय-२०१८/प्र.क्र.२५५/म-७, दि.८ मार्च, २०१९

**प्रस्तावना :**

कै.वसंतराव नाईक शेती स्वावलंबन मिशनची पुनर्रचना संदर्भ क्र.१ वरील दिनांक २४ ऑगस्ट, २०१५ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली असून, सदर मिशनचे अध्यक्ष म्हणून मा.श्री.किशोर तिवारी (अशासकीय) यांची नियुक्ती करण्यात आली आहे. मा. अध्यक्षांना राज्यमंत्री पदाचा दर्जा देण्यात आला असून, वित्त विभागाच्या दिनांक १३/०३/२०१२ च्या शासन निर्णयातील जोडपत्र-१ मधील कलम ७ अन्वये लागू असलेल्या सोयी सुविधा लागू करण्यात आल्या आहेत. अध्यक्षांना वित्त विभागाच्या १३/०३/२०१२ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार देय मानधन व भत्ते विभागीय आयुक्त, अमरावती यांनी त्यांच्या आस्थापना खर्चाच्या तरतुदीतून द्यावयाच्या आहेत. इतर सोयी-सुविधा देखील विभागीय आयुक्त, अमरावती यांनी द्यावयाच्या आहेत. मा.श्री.किशोर तिवारी, अध्यक्ष, कै.वसंतराव नाईक शेती स्वावलंबन मिशन यांना कामकाजाचे व्यापक स्वरुप लक्षात घेऊन देय असलेले मानधन रु.७,५००/- प्रतिमहा ऐवजी रु.४०,०००/- प्रतिमहा विशेष बाब म्हणून उपरोक्त संदर्भ क्र.४ वरील दिनांक ८ मार्च, २०१९ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आले आहे. याव्यतिरिक्त संदर्भ क्र.३ वरील दिनांक २९ डिसेंबर, २०१७ च्या शासन निर्णयान्वये मुंबई येथील दौऱ्यामध्ये वास्तव्यासाठी विशेष बाब म्हणून रु.५०००/- या दराने दैनिक भता अनुज्ञेय करण्यात आला आहे.सदर मिशनच्या अध्यक्षांचे मानधन रु.४०,०००/- प्रतिमहा ऐवजी रु.७५,०००/- प्रतिमहा व मुंबई वास्तव्यासाठी मंजूर केलेले रु.५,०००/- दैनिक भत्ता व इतर भत्ते याऐवजी दरमहा रु.५०,०००/- वाढ करुन मा.अध्यक्षांना मानधन व मुंबई दौऱ्यातील वास्तव्य, दैनिक भत्ता व इतर भत्ते या प्रयोजनासाठी एकूण ठोक रक्कम रु.१,२५,०००/- (रु.७५,०००/- + रु.५०,०००/-) “एक विशेष बाब” म्हणून मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

कै.वसंतराव नाईक शेती स्वावलंबन मिशनचे अध्यक्ष यांना दिनांक १ ऑक्टोबर, २०२१ पासून मानधन व दैनिक भत्ता व इतर भत्ते याऐवजी रु.१,२५,०००/- (अक्षरी रुपये एक लक्ष पंचवीस हजार फक्त) दरमहा इतकी ठोक रक्कम “एक विशेष बाब म्हणून” मंजूर करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

मा.अध्यक्षांना उपरोक्तप्रमाणे रु.१,२५,०००/- (अक्षरी रुपये एक लक्ष पंचवीस हजार फक्त) ठोक रक्कम मंजूर करण्यात येत असल्यामुळे त्यांना मुंबई येथे निवासस्थान अनुज्ञेय राहणार नाही. तसेच दिनांक २९ डिसेंबर,

२०१७ च्या शासन निर्णयान्वये मिशन कार्यालयासाठी भाडे तत्वावर मंजूर करण्यात आलेल्या वाहनाची सुविधा याव्दारे रद्द करण्यात येत आहे. केवळ मा.अध्यक्षांना वाहनाची सुविधा हयापूर्वीप्रमाणे चालू ठेवण्याकरीता शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक १३ मार्च, २०१२ मधील तरतूदीतून "एक विशेष बाब" म्हणून सूट देण्यात येत आहे.

याकरिता वरील बाबींवर होणारा खर्च विभागीय आयुक्त, अमरावती यांनी त्यांच्या कार्यालयाकरिता उपलब्ध असलेल्या तरतूदीतून भागवावा.

सदरचा शासन निर्णय हा वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ४०८/२०२१/व्यय-९, दिनांक १४/१०/२०२१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११०२२१५११३८१३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Sanjay Audumbar Dharurkar
Date: 2021.10.25 13:05:33 +05'30'

**( संजय औ. धारुरकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई.
२. विभागीय आयुक्त, अमरावती.
३. सर्व संबंधित जिल्हाधिकारी.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
५. महालेखापाल (लेखा परीक्षा) १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
६. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
७. अधिदान व लेखाधिकारी, अमरावती.
८. श्री.किशोर तिवारी, अध्यक्ष, कै.वसंतराव नाईक शेती स्ववलंबन मिशन, अमरावती.

**प्रत माहितीस्तव,**

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. निवड नस्ती, कार्यासन (म-७).